# आम्ही चालवू हा पुढे वारसा



- संपादक -

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

- सहसंपादक -

सोनाली घाटपांडे ( पुणे )

भारती सरमळकर ( मुंबई )

सचिन काकडे ( मुंबई )

शशिकांत रणवरे ( मुंबई )

सारंग भणगे ( पुणे )

# संपादकीय

गेली अनेक वर्षे आपल्या अवीट गीतांच्या माध्यमातून मराठी माणसाच्या मनावर अधिराज्य गाजविणारे ज्येष्ठ कवी व गीतकार **जगदीश खेबुडकर** यांचे मंगळवार,३ मे २०११ रोजी  निधन झाले.ते ७९ वर्षे वयाचे होते . आजारपणामुळे त्यांना रुग्णालयात दाखल करण्यात आलं होतं. तरीही शेवटच्या दिवसापर्यंत ते गीतं लिहत होते. मराठी काव्यप्रांतातील विविध गीतप्रकारांना अवीट सुरावटींद्वारे लीलया वळण देणारा हा अवलिया कवी काळाच्या पडद्याआड गेला आहे. जगदीश खेबुडकरांच्या काही अप्रतिम निवडक गीतांनी सजलेला नेटाक्षरीचा हा विशेषांक खेबुडकरांना मानाचा मुजरा.आम्ही चालवू हा पुढे वारसा ह्या वचनासोबत.....

व्ही शांताराम, दादा कोंडके, भालजी पेंढारकार अशा दिग्गजांसोबत त्यांनी काम केलं होतं. त्यांच्या लोकप्रिय गाण्यामध्ये 'तुम्हावर केली मी मर्जी बहाल', 'कुठं कुठं जायचं हनिमूनला', 'ही कशानं धुंदी आली', 'राजा ललकारी अशी रे' ही गीते आहेत.अडीच हजारांहून अधिक गीतं त्यांनी लिहिली. सुमारे ३२५ चित्रपटांसाठी त्यांनी गीतलेखन केलं आहे. ४८ संगीतकारांनी त्यांच्या गीतांना संगीत दिलंय. ३६ गायक आणि ३६ गायिकांनी खेबूडकर यांची गीतं गायली आहेत. १९६० पासून सातत्याने ते लेखन करत आले.गीतलेखनासाठी ११ राज्य पुरस्कारांसह बालगंधर्व पुरस्कार, कुसुमाग्रज साहित्य पुरस्कार, ग. दि. मा. पुरस्कारांनी त्यांना गौरवण्यात आलं.गण गवळण या चित्रपटात सर्व १९ गाणी खेबुडकरांची होती. "दुर्गा आली घरा" हे सर्वात मोठं म्हणजे १६ मिनिटांचं गाणं खेबुडकर यांनी लिहिलं आहे. खेबूडकरांनी बालगीत, प्रेमगीत, नांदी, पोवाडा, भक्तिगीत, किर्तन, स्फूर्तीगीत, देशभक्तीपर गीत, गण, गौळण, वग, लावणी, हादग्याची गाणी, गौरी गीत, झगडा गीत, सवाल-जवाब, कोळी गीत, अस्वलवाला, माकडवाला, नंदीबैलाचे गीत, वासुदेव गीत, भजन, दिंडी अशा अनेक प्रकारात गीतलेखन केलंय. लिखाणाव्यतिरिक्त गायन, वादनामध्येही त्यांचा हातखंडा होता. कमल हसनच्या "हे राम" चित्रपटासाठीही त्यांनी लावणी लिहिली होती. लोकरंजन संस्थेच्या माध्यमातून लोककलेसाठी खेबुडकरांनी काम केलं आहे. अभंग थिएटर्स या नाट्यसंस्थेची त्यांनी स्थापना ही केली. त्याच्या माध्यमातून गावरान मेवा या कार्यक्रमाचे ३ हजारांहून अधिक प्रयोग केले आहेत.गावरान मेवा, रामदर्शन, लोकरंजन हे त्यांचे कार्यक्रम विशेष लोकप्रिय ठरले.

मानसन्मान व पुरस्कार - राज्य सरकार - 11, रसरंग फाळके, चित्रपट महामंडळ -2, गदिमा जीवन गौरव, व्ही. शांताराम जीवन गौरव, कोल्हापूर भूषण, मृत्युंजय, सुरसिंगार संसद, पुणे फेस्टिव्हल, छत्रपती शाहू पुरस्कार, करवीर भूषण साहित्य पुरस्कार, जि.प. पुरस्कार, लायन्स रोटरी, विवेक पुरस्कार, शाहू पुरस्कार (इचलकरंजी), शंकराचार्यांकडून पदवी साहित्यरत्न, सरकारनामा योगदान मानचिन्ह, मार्मिक गौरवचिन्ह, धन्वंतरी पुरस्कार, स्टेट बँक फेडरेशन गौरव पुरस्कार, नेहरू युवा पुरस्कार, व्यसनमुक्ती शासन, लावणीरत्न पुरस्कार, नटरा पुरस्कार, केंद्र शासन -1, ईद मिलन 1, शाहीर परिषद पुरस्कार -1 (इचलकरंजी), चंद्रभागातीरी पुरस्कार - 1, रंगभैरव, फाय फौंडेशन, जनकवी पुरस्कार, दूरदर्शन पुरस्कार, देशोन्नती पुरस्कार, कुसुमाग्रज साहित्य पुरस्कार, दारूबंदी प्रचार पुरस्कार, ई टी.व्ही; यशवंतराव चव्हाण साहित्य जीवन गौरव.

खेबुडकर यांचे आत्मचरित्र लवकरच रसिकांसमोर येणार होते. याच वर्षी म्हणजे वयाच्या ८० व्या वर्षी ते प्रकाशित व्हावे, अशी त्यांची इच्छा होती. याशिवाय "चित्रनगरीचे सहप्रवासी' हे त्यांचे सहकलावंतांच्या आठवणींवरचे पुस्तकही आज त्यांनी रसिकांपर्यंत पोचवले आहे.खेबुडकर यांची सर्वच गाणी दीर्घायुषी आहेत. मग ते "निसर्ग राजा ऐक सांगतो', हे निसर्गगीत असो, "देहाची तिजोरी भक्तीचाच ठेवा' हे भक्तिगीत असो किंवा एखादी नटखट लावणी... त्यांनी लिहिलेल्या लावण्या, तर आजही खणखणीत आहेत. म्हणूनच त्यांच्याच लावण्या सादर करून, सुरेखा पुणेकरने मराठी लोककलेला सातासमुद्रापार सलाम मिळविला. या यशाचा त्यांनाही अभिमान होता.

नवोदित कवी,गीतकारांना सल्ला देताना ते सांगत असत, की शब्दांना खोली आणि उंची पाहिजे. त्यातून गाण्याला आयुष्य मिळते. चित्रपट गेला, तरी गाणे रसिकांच्या मनात सदैव राहिले पाहिजे. त्यासाठी कोणाची नक्कल करू नका. गाण्याला चित्रगुणवत्ता असली पाहिजे. स्वतःचे स्थान स्वतःच निर्माण करा. 'आपली दुःखे दुसऱ्याला समजावीत, त्याने समजून, झेलून घ्यावीत, असे प्रत्येकाला वाटत असते आणि त्यातूनच गीताची,कवितेची निर्मिती होते,कवीच्या नकळत कवितेचा जन्म व्हावा’ असे ते म्हणत.म्हणूनच,त्यांनी लिहलेल्या प्रत्येक गीताला काहीतरी रोचक पार्श्वभूमी असायची.तो केवळ शब्दांचा खेळ कधीच नसायचा.त्यांना गीत सुचायचं ते संपूर्णच -अख्खंच्या अख्खं.

खेबुडकर म्हणत,’कवितेचा वारसा कदाचित मला माझ्या आईकडून मिळाला असावा. ती जात्यावर दळण दळताना ओव्या म्हणत असे. त्या मी एकाग्रतेने ऐकायचो. त्यामुळे त्या ओव्या मला आजही पाठ आहेत. माझे बालपण खेड्यात गेले. 1948 मध्ये वयाच्या सोळाव्या वर्षी माझे घर जळत असताना “मानवते तू विधवा झालीस”, ही पहिला कविता मला सुचली. त्या वेळी काळ्याकुट्ट अंधारात, पांढऱ्या शुभ्र कागदावर ही कविता मी लिहिली.माझ्या कवितांवर बा. सी. मर्ढेकरांच्या आविष्काराचा पगडा आहे.'

पूर्वी कोठेही पाठविल्या तरी माझ्या सर्व कविता साभार परत येत. त्यामुळे मी त्या फाडून टाकत होतो; परंतु माझा भाऊ ओरडल्यावर मी त्या पुन्हा लिहून आकाशवाणीसाठी दिल्या. वसंत पवार यांनी माझे गाणे ऐकले व मला ’रंगल्या रात्री अशा', या चित्रपटासाठी गीते लिहिण्याची संधी मिळाली. त्यानंतर त्यांनी अनेक चित्रपट गीते, कविता, लावण्या लिहिल्या.आणि,त्यांना मग कधीच मागे वळून पहाण्याची गरज लागली नाही. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर..प्राजक्ताच्या फुलासारखे जगताना दुसऱ्याच्या ओंजळीत सुगंधाचा दरवळ दिला की, मागे वळून पाहण्याची गरजच नसते.

- स्वप्ना कोल्हे,नाशिक

( संपादक )

# - - - - जगदीश खेबुडकरांची गीते - - - -



देहाची तिजोरी, भक्तीचाच ठेवा
उघड दार देवा आता उघड दार देवा

पिते दूध डोळे मिटूनी, जात मांजराची
मनी चोरट्याच्या का रे भिती चांदण्यांची
सरावल्या हातांनाही कंप का सुटावा

उजेडात होते पुण्य, अंधारात पाप
ज्याचे त्याचे हाती आहे कर्तव्याचे माप
दुष्ट दुर्जनांची कैसी घडे लोक सेवा

स्वार्थ जणू भिंतीवरचा आरसा बिलोरी
आपुलीच प्रतिमा होते, आपुलीच वैरी
घडोघडी अपराधांचा तोल सावरावा

उघड दार देवा आता उघड दार देवा



बाई बाई, मन मोराचा कसा पिसारा फुलला

चिमणी मैना, चिमणा रावा
चिमण्या अंगणी, चिमणा चांदवा
चिमणी जोडी, चिमणी गोडी
चोच लाविते, चिमण्या चाऱ्याला

चिमणं, चिमणं, घरटं बांधलं चिमण्या मैनेला

शिलेदार घरधनी माझा, थोर मला राजांचा राजा
भोळा भोळा जीव माझा जडला, त्याच्या पायाला

रे मनमोरा, रंगपिसारा, अंगी रंगुनी जीव रंगला
गोजिरवाणी, मंजूळगाणी, वाजविते बासुरी डाळिंब ओठाला

येडं, येडं मन येडं झालं, ऐकुन गाण्याला



कुण्या गावाची, कुण्या नावाची
कुण्या राजाची, तू ग राणी
आली ठुमकत, नार लचकत,
मान मुरडत, हिरव्या रानी

खुळू-खुळू घुंगराच्या, तालावर झाली दंग
शालू बुट्टेदार, लई लई झाला तंग
सोसंना भार, घामाघूम झालं अंग
गोऱ्या रंगाची, न्याऱ्या ढंगाची
चोळी भिंगाची, ऐन्यावानी

डळिंबाचं दाणं तुझ्या, पिळलं ग व्हटावरी
गुलाबाचं फूल तुझ्या, चुरडलं गालावरी
कबूतर येडं खुळं, फिरतया भिरी भिरी
तुझ्या नादानं, झालो बेभान
जीव हैरान, येड्यावानी

कवळ्यात घेऊनीया, अलगद उचलावं
मऊ मऊ हिरवाळीत, धैवरात भिजवावं
पिरतीचं बेन तुझ्या, काळजात रुजवावं
लाडीगोडीनं, पुढल्या ओढीनं
जाऊ जोडीनं, राजा-रानी



माळ्याच्या मळ्यामंदी पाटाचं पानी जातं
गुलाब, जाई, जुई, मोगरा फुलवीतं

दादाच्या मळ्यामंदी, मोटंचं मोटं पानी
पाजिते रान सारं, मायेची वयनी
हसत डुलत, मोत्याचं पीक येतं
गुलाब, जाई, जुई, मोगरा फुलवीतं

लाडकी लेक, राजाचा ल्योक
लगीन माझ्या चिमनीचं

सावळा बंधूराया, साजिरी वयनी बाई
गोजिरी शिरपा हंसा, माहेरी माज्या हाई
वाटेनं माहेराच्या धावत मन जातं
गुलाब, जाई, जुई, मोगरा फुलवीतं

गडनी, सजनी, गडनी सजनी गडनी गं

राबतो भाऊराया, मातीचं झालं सोनं
नजर काढू कशी, जीवाचं लिंबलोनं
मायेला पूर येतो, पारुचं मन गातं
गुलाब, जाई, जुई, मोगरा फुलवीतं



सोळावं वरीस धोक्याचं
तरुणपणाच्या रस्त्यावरचं
पहिलं ठिकाण नाक्याचं
अन सोळावं वरीस धोक्याचं गं
सोळावं वरीस धोक्याचं
पिसाट वारा मदनाचा
पतंग उडवी पदराचा
तोल सुटावा अशी वेळ ही,
तरी चालणं ठेक्याचं
अन सोळावं वरीस धोक्याचं गं
सोळावं वरीस धोक्याचं
रात रुपेरी फुलली गं
मला पौर्णिमा भुलली गं
अंगावरती सांडू लागलं
टिपूर चांदणं रुप्याचं
अन सोळावं वरीस धोक्याचं गं
सोळावं वरीस धोक्याचं
ओढ लागली संगतीची
नजरभेटीच्या गमतीची
आज मला हे गुपीत कळलं,
जत्रेमधल्या धक्क्याचं
अन सोळावं वरीस धोक्याचं गं
सोळावं वरीस धोक्याचं



धुंदीत गाऊ, मस्तीत राहू
छेडीत जाऊ आज प्रीत साजणा

थंडी गुलाबी, हवा ही शराबी
छेडीत जाऊ आज प्रीत साजणी

रुपेरी उन्हांत, धुके दाटलेले
दुधी चांदणे हे, जणु गोठलेले
असा हात हाती, तू एक साथी
जुळे आज ओठी माझ्या गीत साजणा

दंवाने भिजावी इथे झाडवेली
राणी फुलांची, फुलांनीच न्हाली
ये ना जराशी, प्रिये बाहुपाशी,
अशी मीलनाची आहे रीत साजणी

अशी हिरवळीची शाल पांघरावी
लाली फळांची गाली चढावी
हळूहळू वारा, झंकारि तारा
आळवित प्रीतीचे संगीत साजणा

जळी यौवनाच्या, डुले हा शिकारा
असा हा निवारा, असा हा उबारा
अशा रम्य काली, नशा आज आली
एकांत झाला, जणू आज पाहुणा



दगडांत देव राहे, पशू माणसांत राहे
युग संपले तरीही, माणूस तोच आहे

का आदिमानवाला, विज्ञान-ध्यास होता
गिरीकंदरी तयाचा, अज्ञातवास होता
घर बांधले तरीही, माणूस तोच आहे

भोळ्या दळिंदराच्या, चिंध्यात देह झाके
सूत्रातुनी पटाची, फिरली अगम्य चाके
वस्त्रात रेशमाच्या, माणूस तोच आहे

पोटांत आग होती, खाऊन कंद राही
धान्यास, भोजनाचे-आकाररूप येई
पक्वान्न रांधणारा, माणूस तोच आहे

नव्हता विधी-निषेध, शृंगार काम तृप्ती
संसार-बंधनाची, सक्तीतुनी विरक्ती
बेबंध वासनेचा, माणूस तोच आहे

सेवेस नम्रतेचा, आधारस्तंभ होता
उत्क्रांतिवाद येता, स्वामित्वदंभ होता
सारे मिळे तरीही, माणूस तोच आहे



ही दुनिया हाय एक जतरा; हौसं, गवसं, नवसं सतरा
ह्या दुनियेला झुकवत न्हाई तो एक येडा भितरा

नशिबाचा फिरतो पाळणा ही अवघड फेरी
कुनी धरली हातामधी समजंना दोरी
घेरी येउन वरडंल त्याला जलमाचा बसतो हादरा

गरिबीचा शिनिमा बगा सोडुनी लाज
सुकासंग दुक्खाची ऐका वाजतीया झांज
येडी आशा भावली होउन उगाच दावतीया नखरा

ह्यो फिरतो घोडा नाव त्याचं यवहार
कुनी चोर असंल त्यो टांग टाकुनी स्वार
हितंच हाय परि दिसत न्हाई पोलिस मारतोय चकरा

हे माणुसकीचं हाटेल बघतंय वाट
कुनी तिखाट भेटतोय हितं कुनी गुळमाट
तुकड्यासाठी लाचार होउन शेपुट हलवी कुतरा

या गर्दीमंदी इसर पडतो देवाचा
तोंडानं चालतो गजर नुसत्या नावाचा
काळ्या पैशाची चांदी घेउन देवळाला मारत्यात पतरा
ही दुनिया हाय एक जतरा



गुरुने दिला ज्ञानरुपी वसा
आम्ही चालवू हा पुढे वारसा

पिता बंधु स्नेही तुम्ही माऊली
तुम्ही कल्प वृक्षातळी सावली
तुम्ही सूर्य आम्हा दिला कवडसा

जिथे काल अंकुर बीजातले
तिथे आज वेलीवरी ही फुले
फलद्रुप हा वृक्ष व्हावा तसा

शिकू धीरता,शूरता,वीरता
धरु थोर विद्येसवे नम्रता
मनी ध्यास हा एक लागो असा

जरी दुष्ट कोणी करो एक शासन
गुणी सज्जनांचे करु पालन
मनी मानसी हाच आहे ठसा

तुझी त्याग सेवा फळा ये अशी
तुझी कीर्ती राहील दाहीदिशी
अगा पुण्यवंता,भल्या माणसा

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाण होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फूर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरी लवकरच शतक गाठेल. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८0000 मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करून त्यांनाही ह्या आनंदयात्रेत सहभागी करून घ्यावे ही प्रेमळ विनंती आणि असे करताना आमच्या

netaksharee@gmail.com आयडीचा अंतर्भाव कराल ? नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू.

मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

*– आमची विनामूल्य ई साप्ताहिके –*

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम,बाल नेटाक्षरी , ई स्टाप

*– प्रसिध्द झालेली ई बुक्स –*

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती,प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान,ई शाळा, तो,मी आणि सिगरेट,मोरया,लोकल गोष्टी, मीरा(अनुवाद),ओथंब,सावळ्या मुलीची गाणी,सईची वही,अहं ब्रम्हास्मि

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahity@gmail.com

नेटाक्षरी हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com

आता ई साहित्यची सर्व प्रकाशने सीडी मध्ये देखील उपलब्ध आहेत

फक्त ५० रुपयांत १११ ई पुस्तके . संपर्क करा – ९८६९६७४८२०

आमचे संकेतस्थळ - **www.esahity.com**

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी -* netaksharee@gmail.com